**शासकीय निवासस्थाने**

**शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवानिवृत्ती/बदली/ निधन झाल्यानंतर विहित कालावधीत निवासस्थाने रिक्त करुन घेण्यासाठी समितीची स्थापना**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र.शानिवा-१५०२/प्र.क्र.५८२/०२/२३-अ,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २६ जुलै, २००२.**

**पहा :-** १) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.शानिवा-१५/२०००/प्र.क्र.५७३/२३-अ, दि.८.९.२००० व दि.४.३.२००२

संदर्भाधीन परिपत्रकान्वये शासकीय निवासस्थानात रहाणा-या अधिकारी/कर्मचारी यांची बदली, सेवानिवृत्ती, सेवेत असताना निधन, सेवेतून काढून टाकणे, निलंबन इत्यादी बाबतची माहिती संबंधित कार्यकारी अभियंता व या विभागाला पाठविण्याच्या सूचना वेळोवेळी देण्यात आल्या आहेत. तथापि, प्रशासकीय विभाग व त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयांकडून अशी माहिती पाठविण्यात येत नाही असे दिसून आले आहे. परिणामी शासकीय निवासस्थान विहित कालावधीत रिक्त करुन घेणे शक्य होत नाही. उपरोक्त घटनांची आगाऊ माहिती प्राप्त करुन घेण्यासाठी आणि संबंधित अधिकारी/कर्मचारी यांच्या ताब्यातील निवासस्थाने विहित कालावधीत रिक्त करुन घेण्यासाठी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार खालील अधिका-यांची समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई | -- | अध्यक्ष |
| २) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकात मंडळ, मुंबई | -- | सदस्य |
| ३) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई | -- | सदस्य |
| ४) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्या-२३-अ, मंत्रालय, मुंबई | -- | सदस्य |
| ५) उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (कार्या.मिव्य), मंत्रालय, मुंबई | -- | सदस्य |
| ६) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्या.२३-अ, मंत्रालय, मुंबई | -- | सदस्य |
| ७) कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विभाग, वरळी | -- | सदस्य |
| ८) कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी | -- | सदस्य |
| ९) कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई | -- | सदस्य सचिव |

**या समितीकडून पुढील बाबी हाताळण्यात येतील :-**

(१) वर्षाच्या सुरवातीला बृहन्मुंबईतील सर्व कार्यालयांना पत्र पाठवून शासकीय निवासस्थानात रहाणा-या व दि.१ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधीत सेवानिवृत्त होणा-या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांची माहिती आगाऊ संकलित करणे.

कृ.मा.प.

(२) बदली, बडतर्फी, निलंबन अथवा सेवेत असताना निधन पावलेल्या अधिकारी/कर्मचा-यांची माहिती वेळीच प्राप्त होण्यासाठी कार्यपध्दती ठरविणे.

(३) उपरोक्त घटनेनंतर संबंधितांविरुध्द विहित कालावधीत निष्कासन कार्यवाही पूर्ण करुन नियमानुसार निवासस्थान रिक्त करुन घेण्याबाबत दक्षता घेणे.

(४) रिक्त निवासस्थानांचा आढावा घेऊन वाटपासाठी सामान्य प्रशासन विभागाला उपलब्ध करुन देणे.

(५) अनधिकृत वास्तव्य करणा-या अधिकारी/कर्मचारी शासकीय निवासस्थानाचे भाडे/वीज बिल यापोटी शासनास येणे असलेल्या रकमेची संबंधितांकडून वसूली करण्यासाठी कार्यपध्दती ठरविणे आणि थकबाकी वसूलीवर नियंत्रण ठेवणे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(नी.र.चाचड)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत :-

१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. उपमुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. समितीचे अध्यक्ष व सदस्य **(पत्राने)**
६. सर्व मंत्रालयीन विभाग,
७. मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
८. सक्षम प्राधिकारी, जुने जकात घर, मुंबई,
९. अधीक्षक अभियंता, मुंबई मंडळ, मुंबई
१० कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई
११. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विभाग, वरळी, मुंबई
१२. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी (प), मुंबई
१३. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई **(पत्राने)**
१४. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई **(पत्राने)**
१५. प्रबंधक, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई **(पत्राने)**
१६. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई **(पत्राने)**
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई **(पत्राने)**
१८. निवड नस्ती.